ई-साहित्य प्रकाशन

अंक क्र. - ३५

दिनांक -१३ जुलै, २००९




संपादक -
सचिन काकडे (मुंबई )

अतिथी संपादक –
मंदार चोळकर (मुंबई)

सहसंपादक –
सोनाली घाटपांडे ( पुणे )
अहं ब्रह्मास्मि ( पुणे )
सारंग भणगे ( पुणे )
स्वप्ना कोल्हे ( नाशिक )
भारती सरमळकर (मुंबई )

*"मल्हार" कोरडी हाक*

*नभाच्या पार जशी पोचते*

*सावळ भरल्या मेघांनाही*

*तव ओली कविता सुचते*

## ।। संपादकीय ।।

सुखःदुखःच्या, अस्तित्वाच्या सीमारेषा ओलांड्न
भान विसरुन सावळी समाधी लावलेल्या आभाळाकडे
‘ती’ कुठल्याश्या नजरेने पाहत होती.....
आज तिला पाउस हवा होता
मनभर साचलेल्या आठवणीचे मेघ जमवुन
ती क्षितिजावर उभी होती
आज तिला बरसायचयं,
आज तिलाही पाउस व्हायचय,
ओघळत जायचय,
कुठल्यातरी ओजंळीतुन,
फ़ुलणा-या कळीतुन,
ओल्या नजरांनी, कोरड्या श्वासांनी
ती वाट पाहत होती.....
फ़क्त त्या पावसाची
अन नकळत भरुन आलेल्या
तिच्या त्या मनातुन.....
एक ‘सुर’ नभाच्या पार गेला
तिच्या पावालांना विजांनी पैंजण घातली
मेघ गरजले, लख्खलख्खसे सुर उमटले
दिशांत फ़िरले, मनभर झरले,
त्या रिमझिम सरीचा नुपुरनाद,
वा-याची झुळक, ती खुळी दाद,
अगणित स्वरांच्या मिठीत ती भिजु लागली
अन सजु लागली ‘ती’
माझी अल्लड ‘कविता’

नेटाक्षरीचा हा सुचलेला “मल्हार” पावसाला अर्पण

..हुरहुर..

मल्हार सहज मी गाता
पाऊस कुठूनसा आला
भर दिवसा या मेघांनी
अंधार केवढा केला

ही आषाढ प्याली माती
उधळते नवा मृदगंध
पाखरे फुलांवर ओल्या
नाचती स्वैर स्वच्छंद
लपंडाव इथे किरणांचा
गवतावर थरथरलेला

मल्हार सहज मी गाता
पाऊस कुठूनसा आला..

कातरवेळी एकांती
मनी हुरहुर दाटे काही
सोबती इथे सगळयांचे
पण माझे कुणीच नाही
अंगणात तेव्हा कोण
हा चंद्र सांडूनी गेला
मल्हार सहज मी गाता
पाऊस कुठूनसा आला..

ओठांवरती या शब्द
गोठून काहीसे गेले
बाऱ्यावर थेंब टप्पोरे
गालांवरती उरलेले
अंगावर येई शहारा
स्पर्शात चिंब भिजलेला

मल्हार सहज मी गाता
पाऊस कुठूनसा आला..

**- मंदार चोळकर (मुंबई)**

**--------जाऊ नकोस-----------**

जाऊ नकोस.....

मी अडवत नाहीये तुला

तुझ्या पावलांना.....

या पावसाच्या थेंबांच

एकमेकांशी बोलण संपू दे

मग जा.....

तोपर्यंत थांब

थांब मला ऐकवायच्या आहेत

या सरी तुला .....

तुझ्यावर लिहिलेल्या

मघाशी जेव्हा तू सावळ आभाळ

माझ्या हातात दिलस.....

तेव्हाच मी हा पाऊस त्यावर

लिहिला होता

जरा थांब

थांब जरा

या सरीं ओलांडून जाऊ नकोस

'आठवण' रहाणार नाही

तुला 'या पावसाची'

**-----सचिन काकडे**

## पाचोळयातला  पाऊस

पाऊस आला आणि भिजले
मनातले ते सुके कोपरे
तेच मग ते जुनेच प्रश्न
अंकुर होऊनी ठाकले

त्याच झ-याच्या त्याच किनारी
पाषाणाने मान टाकली
कोसळल्या मग त्याच धारा
रडता रड्ता खोली वाढली

तोच गारवा नी तीच हिरवळ
पण मात्र मन शांत का?
पालवीच्या बहरण्याला
आज माझाच आक्षेप का?

गारठल्या त्या जड थेंबांना
ओठ तुझे तव सावरी
आज त्याच रात्र ढगांना
ही धाराही अपूरी

किंचित थोडे सावराया
प्रश्नच जेव्हा धावले
प्रेमाच्या असह्य पुरात
नावा होऊन वाहले

“चल ना जाऊ त्याच पुरात
ही धारा नाही आपुली
दोघेही मग रूजून येऊ
पाषाणाच्या अंतरी....”

नकोच मज हा पाऊस आता
अन झ-यातील पाचोळा
तोच तो मग हर एक वर्षी
साठवणीचा पावसाळा....आठवणीतील पावसाळा

**--संदिप उभळकर**

## पाऊस

पावसाला धर्म नसतो
नसतात कोणती नाती
पाऊस म्हणजे हिरव्या वाटा
नखशिखान्त भिजली माती

पावसाचा रंग आगळा
पावसाची भाषा निराळी
पाऊस म्हणजे गोड गारवा
सूर मुक्त लडिवाळी

पाऊस आपला सखा-सोबती
पाऊस म्हणजे आई
श्रावणातला स्पंद गोजिरा
पाऊस मनातून गाई

पावसाचे वेड मला हे!
पाऊस माझा छंद
पाऊस माझा श्वास सख्या रे
पाऊस हळवा बंध

**-निरज कुलकर्णी**

# नेहमीच पाऊस तसा

नेहमीच पाऊस तसा....आज वेगळा वाटला....
कोरड्या झालेल्या मातीत...नाच नाच नाचला....

तेच थेंब,तेच पाणी
पावसावरही तीच गाणी...
गाण्यातला सूर जरा तेवढा.....
एकटा एकटा वाटला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

पाण्यातून वाहणारी कागदाची होडी
वाफाळलेल्या कपातीच चहाची गोडी
कप जुना तसाच मात्र
चहातलाच गोडवा आटला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

रस्त्यावरचा नकोसा चिखल सारा
घरा-घरात घुसणारा सोसाट्याचा वारा
घरं अगदी तशीच उभी
वाराच कसा दिशा भरकटला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

पावसामुळेच काय ते प्रेम बिम जमलं होत
एका हाताने दुस-या हाताला हळूच हातात घेतलं होत
प्रेम कधीच संपल
कारण हातच कायमचा सुटला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

अश्रूंना तुझ्या या आवर रे आता
दु:खातीन तु जरा सावर रे आता
अश्रु कधीचेच आटले हो
एक थेंब फक्त डोळ्यात साचला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

पावसावरती कविता लिहीन म्हणालो
ओलं चिंब अंग करीन म्हणालो
ओलं चिंब होण्याआधीच
पाऊसच संपला

नेहमीच पाऊस तसा...आज वेगळा वाटला....

----ललित

पापणीस माझ्या स्पर्श सुरांचा होतो
स्वर गाती माझे,अन मी श्रोता होतो ।।धृ।।

मी कुशीत शिरतो त्यांच्या आवर्तांच्या
माझ्याभवती हा मेळ सप्तरंगांचा
मी स्वत्व विसरतो...अधीन त्यांच्या होतो
स्वर गाती माझे, अन मी श्रोता होतो ।।१।।

माझ्याच आतला सूर गवसतो आहे
मी अनाहताचा नाद ऐकतो आहे
मी तद्रुप होतो....तानपुरा मी होतो

स्वर गाती माझे,अन मी श्रोता होतो ।।२।।

पाऊस स्वरांचा नभ हे धरले ताल
हा वारा गाई अंतरातले बोल
मी मल्हाराचा निषाद कोमल होतो
स्वर गाती माझे,अन मी श्रोता होतो ।।३।।

मी आज ऐकले सागरास गाताना
ती लाटांचा लय किना-यात भिनताना
गाता गाता मी कण वाळूचा होतो
स्वर गाती माझे,अन मी श्रोता होता ।।४।।

**----अभय भावे**

## त्या ओल्या सायंकाळी

त्या ओल्या सायंकाळी
मन मोर नाचला होता
सल तुझ्या कुंतलात
श्वास गुंतला होता

श्वासात मोग-याच्या
मनमोर झुरत होता
क्षितिजावर जीवनाच्या
मेघ दाटला होता

तव भाळीच्या क्षितिजी
सुर्य रेखीला होता
नजरेत पोर्णिमेचा
चंद्र उदेला होता

तव नयनांच्या हिंदोळी
मनमोर झुलत होता
हृदयात गर्द निळाई
मल्हार जागला होता

त्या ओल्या सांयकाळी
मनमोर नाचूनी गेला
काठांवरती आठवणींच्या
एक पीस गाळूनी गेला

**--अनुराग कौशिक (मुंबई)**

## .पाऊस..

नोकरी काय गेली
प्यायची मारामार झाली
(खायची कुनाला शुध राहती ?)

वडापाव हानला
गेलो समुंदरला
शंख करायला
तर तो पन चेकाळलेला
अंगावर येत होता साला
आस्मान पान्याला टेकू झालेलं
झाडं जीव घेऊन झुलत होती
आत्ता पडली,तेव्हा पडली
आभाळ लाल गोळा गिळून फुगलेलं
कव्हाबी फुटंल इतकं तट्टं
म्हंजे पाऊस येनार ?
म्हंजे समुंदरात आनखीन पानी
आन मी मातुर प्यासा
हट००
निघालो खोलीवर..तर गाठलंच त्यानं
ढाण्या वाघानं हरीन गाठावं तसं
गार थेंबांच्या सुयांनी भोसकलं
सुसाट वाऱ्याने पिसलं
वीज धावली साली अंगावर
आन जीव वाचवत मी खोलीत धावलो
तर छप्पर फुटायला आलेलं
गळत होतं..
फुटक्या नशिबासारखं..

येक क्वाट्टर घेऊन लुडकलो मग
वीजेच्या लपंडावात..
ओल्या कचराकुंडीवर
जोर आलेले कुत्रे
दारापुढल्या नाल्यात
फुगलेली बेडकं..
आत्ता चालंल तमाशा रातभर..

शेजारनीकडे रेडिओ गात होता
"लगी आज सावन की फिर"
कच्चूची याद आली यार एक्दम००
पावसात येड्यावानी
नाचायची
भिजायची
हासायची
तिचे ते ओलेते केस
ओठांवर थाम्बनारा पाऊस
मला जाळायचा..
००००
..मं लिहलं गीत..
..टाकलंय सुकायला..
..कपडे वाळत घालायच्या दोरीवर..
..सुकलं की करील पोस्ट इथं..
००००

**---स्वप्ना कोल्हे (नाशिक)**

## ..पाऊस..

आता आत बाहेर जळत राहतो पाऊस
पुन्हा जखमा ओल्या करत राहतो पाऊस

तुझ्या आठवात कधी तुझ्या विचारात
गाणं तेच तेच म्हणत राहतो पाऊस

चाहूल न लागे,जोवर तुझ्या पावलांची
कसा नभातच झुरत राहतो पाऊस

किती तुज स्पर्शिल्या,अन किती पळ हुकल्या
हिशेब धाराधारांचा करत राहतो पाऊस

तुला न्यायचे पार त्या ढगांच्या गावी
कल्पनेत आतल्या आत भिजत राहतो पाऊस

पण पाहून तव हात,हातात माझ्या
कसा डोंगरा आडूनच परत जातो पाऊस

सोडून तू गेलीस मज,त्या दिवसापासूण
मृगातच हस्तासारखा पडत राहतो पाऊस

तुला निभवता नाही आले प्रेम त्या फुलाचे
चिखल चेहऱ्यावर उडवत राहतो पाऊस

अरे आता बरसणे नाही रे पूर्वीसारखे
पापण्यांवर मेघ ठेवून रडत राहतो पाऊस

**---कौस्तुभ आपटे (मुंबई)**

## ..आषाढ..

आभाळाला भरुन आलं
की ते मनसोक्त बरसतं
आणि निरभ्र होतं

मलाही भरुन आलंय
मन भरुन बरसायचंय
निरभ्र व्हायचंय

अशी जागा कुठे असेल का ?
असेलही कदाचित
पण ती जागा मिळेपर्यंत
माझ्या आषाढाला
थांबावं लागेल
कुणीतरी नक्कीच
मल्हार गाऊन
पाऊस मागेल

**----तुषार जोशी (नागपूर)**

# अतिथी संपादकाची ओळख



नाव - मंदार शशिकांत चोळकर
निवास - दादर,मुंबई
व्यवसाय – ग्राफिक डिझायनर
एका ऍडव्हर्टायझिंग स्टुडिओमध्ये सिनीअर व्हिज्युअलाईजर म्हणून कार्यरत )

प्रकाशित साहित्य –

- नोव्हेंबर २००७ मध्ये चारोळीसंग्रह 'शब्दांत माझ्या' ज्येष्ठ कवी श्री.गंगाधर महांबरे यांच्या हस्ते प्रकाशित झालेला आहे.
- जुलै २००८ मध्ये 'ऑडवाटेच्या कविता' ह्या ऑर्कुटच्या पहिल्या काव्यसंग्रहात 'पाथरवट' ही कविता प्रकाशित.
- 'शरपंजरी आज मी' काव्य शृंखला संग्रहात 'एकलव्य' ह्या लयगद्याचा समावेश.
- जुलै २००८ मध्ये 'मी मराठी' वाहिनी वरुन सादर झालेल्या 'जोडी नं १' ह्या कथाबाह्य मालिकेचं शीर्षकगीत लेखन.
- एप्रिल २००९ मध्ये सादर झालेल्या 'हास्य कट्टा' आणि 'छोटी खुशी मोठ्ठा फन' या दोन कथाबाह्य मालिकेचे शीर्षकगीत लेखन.
- जुलै २००९ मध्ये प्रकाशित 'यारी तुझी' ह्या अल्बममधील २ गीतांचे लेखन.(संगीतकार - अजय नाईक,गायक - स्वप्निल बांदोडकर व मधुरा दातार आणि राहुल वसंतराव देशपांडे)

तसेच,पुण्याला २००८ मध्ये झालेल्या 'बरस रे मना' ह्या कार्यक्रमात त्यांच्या एका कवितेचं (ईशस्तवन) गीतात रुपांतरण करुन त्यावर शास्त्रीय नृत्य सादर केलं गेलं.
ऑगस्ट २००८,नाशिक येथे 'बरस रे मना' कार्यक्रमात त्यांच्या एका कवितेचे गीत व नृत्यात सादरीकरण केले गेले.

आगामी प्रकाशन –

- सध्या २ चित्रपटांसाठी आणि २ अल्बमसाठी गीतलेखन चालू आहे.
- जून २००९ मध्ये हा योगिता चितळे यांचा अल्बम **'life is beautiful'** प्रकाशित होतोय,त्यात एक गीतलेखन.(संगीतकार - निलेश मोहरीर)
- सप्टेंबर २००९ मध्ये त्यांच्या 'पाऊस' कवितांना एका कार्यक्रमात गीत व संगीतबध्द करुन सादरीकरण करण्याचा मानस आहे.

## अतिथी संपादकाच्या लेखणीतुन -

पावसाच नात प्रत्येकाशी असतचं, मग तो पाऊसवेडा असेल किंवा पावसाला नाव ठेवणारा असेल जन्मापासून मरणापर्यंतच्या आयुष्याच्या वाटचालीतले जमाखर्च सांगायचे झाले की आपण अमुक तमुक पावसाळे पाहिले अस सहज बोलून जातो . यावरूनच पावसाच आपल्या आयुष्याशी असलेल नात कळून येत.

वास्तविक पहाता उन्हाळा, हिवाळा तस्साच पावसाळा पण या पावसाळा या चार अक्षरी शब्दात जो काही गारवा, शहारा, ओलावा आणि झालचं तर उधाण भरलेल आहे ना, ते इतरत्र कुठेही अभावानचं जाणवेल .

पूर्वीच्या काळी म्हणे मल्हार आळवला की पाऊस यायचा तेव्हा पाऊस कलेचा भोक्ता होता किंवा कलाकार सच्चे होते, अस म्हणूया त्यामुळे कुणी मनापासून साद घातली की हा पठ्ठ्या हजर व्हायचा निर्मळ मनाने.

त्यानंतरच पावसाच व्यवहारिक रूप आपल्याला पहायला मिळतं ते ' ये रे ये रे पावसा तुला देतो पैसा'या कवितेतून पैसा फेकला की पाऊस येणार ही कविकल्पना सुध्दा माणसाच्या स्वार्थी मनोवृत्तीच समर्पक उदाहरण आहे . त्याहीपेक्षा वाईट म्हणजे खोटा पैसा देऊन पाऊस पाडायची अपेक्षा करणं

थोडक्यात काय तर आपल्याला हवा तसा हवा तेवढा पाऊस कसा मिळवायचा ते माणूस बरोबर शिकला आहे, मग त्यासाठी संगीतातले राग आळवा, पैसा फेका, यज्ञ करा किंवा इतर शास्त्रीय पध्दती वापरा, बापाचा माल असल्या सारखा पाऊस आपल्या सेवेला हजर.

पावसाची वेगवेगळी रूप हा एक वेगळा चर्चेचा विषय होऊ शकतो , भुरूभुरू पासून ढगफुटी पर्यंत पाऊसा ही अनुभवायची गोष्ट आहे, सांगायची किंवा ऐकायची नाही. अस असूनही कवीची प्रतिभा ही 'शब्दातून साक्षात अशा प्रकारची प्रचिती देणारी कला असल्यामुळे . आजच्या या नेटाक्षरी 'मल्हार' विशेषांकानिमित्ताने भिजून घेऊया एकदा सचैल शब्द सरीत !!!

चला तर मग काढा आपले गमबूट्स , रेनकोट, तुमच्या तिच्या किंवा त्याच्या सोबत घालवलेले बरसाती क्षण ................... गच्च ओल्या – पावसाने की आसवाने झालेल्या आठवणी ................... सगळ सगळ येऊदे या निमित्ताने बाहेर आणि बरसू दे जे काही बरसायच ते !!!



PAGE ARTWORK : अमृता ढगे

काव्यांजली आणि मराठी कविता तुमच्यासाठी घेऊन येत आहेत

====================================

नवरस काव्यस्पर्धा मालिका

====================================

यात आहेत साहित्यातील नऊ रस प्रत्येक स्पर्धा एका रसावरील कवितांची
नऊ रस नऊ स्पर्धा एक महामालिकाच म्हणा ना !!!
दर महिन्याला एक रस तब्बल नऊ महिने चालणारे ही धम्माल !!!
काव्यस्पर्धेचा उद्देश 'चढाओढ'हा नाही, कोणी छोट - मोठं, कविता चांगली वाईट सिध्द करण हा ही नाही.
ही स्पर्धा आपल्या प्रतिभेला आव्हान आहे, सृजनशक्तीला आवाहन आहे.
निवडक कविता नेटाक्षरीमध्ये प्रसिध्द होतील. हजारोंपर्यंत जातील. बक्षिसेही असतीलच.
लिहा मंडळी ! बघुया महाराष्ट्राच्या उद्याच्या 'लेखण्या' काय आहेत ते.

====================================

या महिन्याचा 'रस'विषय रसराज 'रौद्ररस'

====================================

तुमच्या १/२ 'रौद्ररस' पुर्ण कविता आम्हाला १५ जुलै २००९ पर्यंत
marathikavitamarathispardha@gmail.com
वर पाठवा. सोबत आपल्या ओरकूट प्रोफाईलची व ब्लॉगची लिंक नक्की पाठवा.
अधिक माहिती कम्युनिटीवर मिळेल.

रसिकांना नेहमी उत्तमोतम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ३५००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्याव्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करून वाचणाऱ्यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फ़ॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतू असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू . मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्यासारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहोचवण्याचा आमचा संकल्प सिद्धीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

netaksharee@gmail.com